20040812150127001
1700

झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, बृहन्मुंबई
प्राधिकरणाचे अधिकार व कर्तव्ये -

महाराष्ट्र शासन
गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्र. झोपुयो-१०९५/प्र.क्र.१८/गृ.नि.सेल
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : ~~[illegible]~~

- 6 जुलै 1996

प्रस्तावना :-

बृहन्मुंबईतील ४० लाख झोपडपट्टीवासियांना विनामूल्य पक्की घरे देण्याचे धोरण शासनाने घोषित केले आहे. ही झोपडपट्टी पुनर्वसन योजना राबविण्यासाठी शासनाने महाराष्ट्र झोपडपट्टी (सु. नि. व पु) अधिनियम १९७१ मध्ये सुधारणा केलेली आहे. सदर सुधारित अधिनियमातील कलम ३ अ(१) व (२) अन्वये शासनाने अधिसूचना क्रमांक - झोपुयो-१०९५/प्र.क्र.३८/गृ.नि.सेल दिनांक १६.१२.१९९५ अन्वये बृहन्मुंबईसाठी झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाची स्थापना केली आहे. ह्या अधिनियमातील कलम ३अ (३) अन्वये प्राप्त अधिकारांचा वापर करुन, या प्राधिकरणाला अधिकार व कर्तव्ये नेमून देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :-

प्रस्तुत अधिनियमातील उपरोक्त तरतुदी अन्वये मिळालेल्या अधिकारांचा वापर करुन शासनाने झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाला खाली नमूद केलेले अधिकार व कर्तव्ये नेमून देण्यास मंजूरी प्रदान केली आहे :-

प्राधिकरणाची कार्ये, कर्तव्ये व शक्ती :-

१) झोपडपट्टी पुनर्वसन योजनेसंबंधातील महाराष्ट्र झोपडपट्टी (सुधारणा निर्मुलन व पुनर्विकास) अधिनियम १९७१ मधील तरतुदींची अंमलबजावणी करण्यासंबंधात सर्वप्रकारची कार्यवाही करणे.

२) महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम १९६६(सुधारीत १९९६ च्या कलम २(१९) (ब) नुसार नेमून दिलेली कर्तव्ये पार पाडणे.

३) तसेच मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ यामधील सुधारीत कलम १४०(अअअ) व ३५४ नुसार प्राधिकरणाचे अधिकारी कर्तव्य पार पाडतील.

४) झोपडपट्टी पुनर्वसन कार्यक्रम यशस्वीरितीने राबविण्याची जबाबदारी झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाची असेल. या संदर्भात त्यांनी [illegible] व मार्गदर्शक अशी भूमिका बजावयाची आहे.

५) वेळोवेळी कायद्याने किंवा शासकीय आदेशाने सुपूर्द केलेली कार्ये व जबाबदाऱ्या पार पाडणे.

६) पुनर्वसन योजनेत सहभागी होण्यासाठी झोपडपट्टीवासियांच्या पात्रतेबाबत काही अडचण अथवा शंका असल्यास त्याबाबतचा अंतिम निर्णय प्राधिकरण घेईल.

७) योजना राबविणाऱ्या अभिकरणांस (एजन्सींना) विविध शासकिय/निमशासकिय परवानग्या मिळवून देण्यासाठी एक प्रभावी कार्यपद्धती सुनिश्चित करणे ज्यात एकाच दालनांत सर्व परवानग्या मिळण्याची व्यवस्था असावी.

८) झोपडपट्ट्यांमध्ये समाज विकास अधिकारी/कर्मचारी पाठवणे, पुनर्वसन योजना समजावून सांगणे व योजनेत भाग घेण्यास प्रवृत्त करणे, पुनर्वसनास पात्र असणाऱ्या झोपडपट्ट्यांचा शोध घेणे, त्यांचे प्राधान्य ठरविणे, विकासकाने (सहकारी संस्था, स्वयंसेवी संस्था इत्यादि अंतर्भूत आहेत) योजना कशी तयार करावी, कोणाची मदत घ्यावी इत्यादी बाबतीत मदत मागितल्यास त्यांना मदत करणे.

९) झोपडपट्टी पुनर्वसन योजनेचे प्रस्ताव तयार करण्यास मदत करणे

१०) झोपडपट्टीवासियांची सहकारी गृहनिर्माण संस्था योजना राबविणार असल्यास, त्यांना कायदेविषयक सल्ला देणे व प्रकल्पाचे मान्यतेसाठी प्राधान्य मिळवून देणे. तसेच या संस्थांची प्राथमिक व अंतिम नोंदणी हि एकाच विवक्षित कार्यालयात होण्याची व्यवस्था करणे.

११) योजनेस अकारण असहकार करणाऱ्याविरुद्ध कारवाई करणे. यासंबंधी प्रचलित कायद्याचे पुनरावलोकन करून बदल सुचविणे.

१२) अशा काही योजना असण्याची शक्यता आहे की, ज्यामध्ये स्पष्ट सवलतीहून अधिक सवलती द्याव्या लागतील. शासनाकडून योजनेच्या ज्या विशिष्ट मर्यादा ठरवून दिल्या जातील, त्या मर्यादांच्या अधिन राहून काही सवलती देण्याचे अधिकारी झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणास असतील. मात्र त्या मर्यादा पुरेशा प्रमाणात शिथिलक्षम व लवचिक असतील. तथापि, सवलती देताना प्राधिकरणाच्या सक्षम अधिकाऱ्याने योजनेच्या मूळ संकल्पनेला कोणताही धक्का पोहोचेल असा निर्णय घेता कामा नये.

१३. संक्रमण शिबीरे बांधण्याच्या कार्यक्रमाची अंमलबजावणी करून घेणे, संक्रमण शिबीरे बांधणाऱ्या संस्थांना उद्दिष्ट ठरवून देणे, भूखंड उपलब्ध करून देणे, बांधकामासाठी कालमर्यादा ठरवून देणे, संक्रमण शिबीरे बांधण्यासंबंधी प्राधिकरणाला पुढील अधिकारी असतील.

(अ) संक्रमण शिबिरांची खाजगी जमिनीवर निर्मिती मोठ्या प्रमाणावर होण्याकरिता योजना व ना.ज.क.धा. कायद्याशी सांगड घालणे.

(ब) राज्य शासनाच्या जमिनी, स्थानिक प्राधिकरण आणि सांविधिक मंडळे यांचे भूखंड संक्रमण शिबीरे बांधण्यासाठी वापरणे. तत्संबंधी योग्य जमिनीचा शोध घेवून निवड करणे व संबंधीत प्राधिकरणास निदेश देणे.

( ) हे काम योग्य वाटेल अशा अभिकरणाकडे / मंडळाकडे सुपूर्द करणे.

(ड) संक्रमण शिबीरात पात्र झोपडपट्टीवासियांना, योजनेत ठरविल्याप्रमाणे अग्रक्रमाने पर्यायी जागा देणे.

१४) खाजगी जमिनमालकास त्यांच्या जमिनीवर वसलेल्या झोपडपट्टीसंबंधात योजना देण्यास प्रोत्साहन देणे. या जमिनीची निवड करून योजना कार्यान्वित करण्यास गती देणे.

१५) शासनाच्या मालकीच्या जमिनीवरील योजना समयबद्ध कालावधीत मार्गी लागतात किंवा कसे, यावर नियंत्रण ठेवणे, पुनर्वसन योजनेसंबंधातील कामाचा आढावा घेवून संबंधितांना आदेश देणे. शासकीय व निमशासकीय जमिनीवर योजना हाती घेण्यास संबंधित खात्यास/ मंडळास स्पष्ट निदेश देणे.

१६) योजनेच्या पुनर्वसन क्षेत्रातील बांधकामाची गुणवत्ता टिकविण्यासाठी विकासक, कंत्राटदार व वास्तुशास्त्रज्ञ यांच्या पात्रता/अपात्रता याचा तयार करणे व योजनेचे पुनर्विलोकन करणे या बाबींस योग्य प्रसिद्धी मिळेल व झोपडपट्टी वासियांस ज्ञात होईल याची व्यवस्था करणे.

१७) पुनर्वसन क्षेत्रातील निवासी व अनिवासी गाळे वितरणाचे धोरण ठरविणे.

१८) झोपडपट्टीवासियांच्या सहकारी गृहनिर्माण संस्थांना सहकार कायद्यातील तरतुदीप्रमाणे सल्ला देणे, शासकीय निमशासकीय संस्थांकडून योजनेला आवश्यक असणारी माहिती प्राप्त करून देणे.

१९) या योजनेंतर्गत जे प्रचंड स्वरुपातील बांधकाम करावयाचे आहे, त्यात साहित्यात खंड पडू नये, म्हणून खडी, वाळू अशासारख्या बांधकाम साहित्याची आवश्यकता भासेल. त्याचप्रमाणे शासकीय विभागांना, निमशासकीय विभागांशी संपर्क ठेवून झोपडपट्टीवासियांच्या विकासकांना/सहकारी संस्थांना मदत करणे याबाबत बैठका घेवून संबंधित खात्यांना योग्य कार्यवाहीचे आदेश देणे.

२०) प्राधिकरणाचा अर्थसंकल्प मान्य करणे.

२१) प्राधिकरणाची सर्व किंवा कोणतीही कार्ये आणि कर्तव्ये पार

पाडण्यासाठी आवश्यक असतील अशा सर्व गोष्टी करणे आणि त्यासंबंधात खर्च करणे.

२२) (अ) पुनर्वसन क्षेत्रातील प्रत्येक गाळ्यामागे रु. २०,०००/- इतकी अनामत रक्कम प्राधिकरणाकडे जमा करून घेणे व ती यथावकाश पुनर्वसित इमारतीतील रहिवाशांच्या सहकारी गृहनिर्माण संस्थेकडे महानगरपालिका कराची प्रतिपूर्ती करण्यासाठी हस्तांतरीत करणे.

(ब) प्रत्येक विकास अभिकरणाकडून पुनर्वसनाच्या दर चौरस फुटास रु. ७५/- वसूल करणे, यापैकी रु. ५०/- मुंबई महानगरपालिकेस सुपूर्द करणे व उर्वरित रु. २५/- प्राधिकरणाच्या खात्यामध्ये जमा करणे.

२३) प्राधिकरणास महाराष्ट्र झोपडपट्टी (सु. नि. व पु.) अधिनियम १९७१ अंतर्गत सुपूर्द केलेली कार्ये करण्यासाठी व कर्तव्ये पार पाडण्यासाठी तसेच शासनाने प्राधिकरणावर विशेष आदेशाद्वारे सोपविलेली कार्ये पार पाडण्यासाठी पुढीलपैकी सर्व किंवा कोणत्याही शक्ती वापरता येतील :-

(१)

(अ) कर्ज घेणे

(ब) करारान्वये निविदा करणे

(क) निविदाबाबत कार्यपद्धती ठरविणे.

(ड) प्राधिकरणाच्या निरनिराळ्या अधिकाऱ्यांकडे अधिकार प्रत्यायोजित करणे.

(इ) या योजनेअंतर्गत कोणत्याही झोपडपट्टीत किंवा या योजनेअंतर्गत पुनर्वसन क्षेत्रासाठी बांधलेल्या इमारतीत आवश्यक असेल तेव्हा प्रवेश करणे किंवा प्रवेश करून झडती घेणे.

(२)

(अ) प्राधिकरणास आवश्यक असलेला कर्मचारीवृंद केवळ प्रतिनियुक्तीवर किंवा कंत्राटी पध्दतीने नेमणे.

(ब) प्रतिनियुक्तीवरील शासकीय अधिकाऱ्यांना अनुज्ञेय प्रतिनियुक्ती भत्ता देणे. शासनाने विहित केलेल्या सर्व सेवा शर्ती प्राधिकरणाच्या सेवेतील अधिकारी/कर्मचारी यांना लावणे.

(क) प्रतिनियुक्तीवरील कर्मचाऱ्यांच्या/अधिकाऱ्यांच्या रजा, वेतन व निवृत्ती-वेतन यांच्या संबंधातील अंशदान अनुज्ञेय दराने गणना करून त्यांच्या मूळ विभागाला रक्कम अदा करणे.

(ड) प्राधिकरणाच्या कामकाजामध्ये शासकीय लेखा पद्धतीचा अवलंब करण्यासाठी विनियम करणे.

२४) केंद्र शासन अथवा त्यांची प्राधिकरणे यांच्या भूखंडावर वसलेल्या

भारत सरकारच्या नियंत्रणाखालील संघटना यांच्याशी संपर्क साधेल व सार्वजनिक सुविधांसाठी ज्या जागा अत्यावश्यक नसतील, अशा जागांवर झोपडपट्टी पुनर्वसन योजना राबविण्यासाठी प्रयत्न करेल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

6/7/96

(डी. एन. वैद्य)

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत

मा. राज्यपालांचे सचिव,

मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव

मा. मंत्री, गृहनिर्माण यांचे खाजगी सचिव

मा. राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव

मा. राज्यमंत्री, गृहनिर्माण यांचे खाजगी सचिव

मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे स्वीय सहाय्यक

आयुक्त बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.

प्राधिकरणाचे सदस्य (पत्राद्वारे)

प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.

प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२

उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, म. गृ. नि. व क्षे. वि. प्रा., वांद्रे(पूर्व), मुंबई ५१.

आयुक्त कोकण विभाग, मुंबई.

मुख्य अधिकारी, मुंबई गृहनिर्माण मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे(पूर्व), मुंबई ५१.

जिल्हाधिकारी, मुंबई.

जिल्हाधिकारी, मुंबई उपनगरे

अतिरिक्त जिल्हाधिकारी (अतिक्रमणे), जुने जकात घर, फोर्ट, मुंबई २३.

गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभागातील सर्व उप सचिव, अवर सचिव व कक्ष अधिकारी

निवड नस्ती (गृहनिर्माण सेल)